**पंचायत समिती पातूर (जि.अकोला)**
**नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास**
**प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०१६/प्र.क्र.२३८/बांध-४

मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
तारीख: २९ जानेवारी,२०१९

**वाचा:-**

**१)** अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प, अकोला यांचे जा.क्र.जिप/बांध/तां/२०१२/१७ दि.१५.०६.२०१७ व दि. ११.०९.२०१७ चे पत्र

**प्रस्तावना:-**

१. अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. अकोला यांनी वरील पत्रान्वये पातूर पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

२. पंचायत समिती, पातूर येथील कार्यालय जुने असून कामकाजासाठी जागा अपुरी आहे. त्यामुळे पंचायत समिती पातूर, जि. अकोला नवीन प्रशासकीय इमारतीच्या रू. ३१५.६६ लक्ष इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अकोला यांनी विनंती केली आहे. नवीन प्रशासकीय इमारत बांधकाम करण्याकरीता पंचायत समितीने दिनांक २४.१२.२०१४ रोजी ठराव क्र. ४ पारीत केला आहे. सदर पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम गट क्र.२४३/१/अ या जागेत प्रस्तावित आहे. सदर पंचायत समिती "क " वर्गात मोडते. त्यानुसार, अति मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अकोला यांनी पंचायत समिती पातूर नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाकरीता मुख्य वास्तुशास्त्रज्ञ सा.बां.वि. मुंबई यांच्याकडील JOB NO टी-एडीएम/५५११, डीआरजी नं-२७ या नमुना नकाशावर आधारीत एकूण ९९५.८१ चौ. मी. क्षेत्रफळाचे बांधकाम प्रस्तावित केले आहे. याकरीता, एकूण रू.३१५.६६ लक्ष किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक सादर केले आहे. सदर अदांजपत्रक सन २०१६-१७ च्या दरसुचीवर आधारीत असून उपअभियंता व कार्यकारी अभियंता,(बांधकाम) जिल्हा परिषद, अकोला यांनी सांक्षाकीत केले आहे. अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अकोला यांनी प्रस्तावासोबत पं.स.च्या ठरावाची प्रत, नमुना नकाशाची प्रत,जागेचा उतारा, ले आऊट प्लॅन, साईट प्लॅन, लिड चार्ट, क्वारी चार्ट, स्ट्रक्चरल ऑडीट व स्थळ दर्शक नकाशा इत्यादी कागदपत्रे सादर केली आहेत.

३. अति. मुख्य कार्यकारी अधिकारी जि.प., अकोला यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या छाननीअंती पातूर पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाच्या एकूण रु.३१५.६६ लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

४. पातूर पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाच्या एकूण रुपये ३,१५,६६,०००/- (रुपये तीन कोटी पंधरा लक्ष सहासष्ठ हजार फक्त) इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधिन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

१) नियोजित पातूर पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारत बांधकामाकरीता मुख्य वास्तुशास्त्रज्ञ सा.बां.वि. मुंबई यांच्याकडील JOB NO टी-एडीएम/५५११, डीआरजी नं-२७ या नमुना नकाशावर आधारीत एकूण ९९५.८१ चौ. मी. क्षेत्रफळाचे बांधकाम हाती घेण्यापूर्वी स्थानिक नगर रचना प्राधिकरणाची तसेच, अग्निशामन यंत्रणेची मंजूरी घेणे बंधनकारक राहील.

२) नियोजीत पातूर पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाकरीता प्रस्तावित करण्यात आलेल्या आराखड्यात पदाधिकारी यांच्या दालनालगत महिला पदाधिकारीसाठी प्रसाधनगृहासह विश्रांती कक्षाची व्यवस्था करण्यात यावी.

३) प्रस्तुत प्रशासकीय इमारत बांधकामामध्ये ग्रीन बिल्डींग संकल्पना अंमलात आणून, नैसर्गिक प्रकाशयोजना व वायुविजन, पाण्याच्या व उर्जेच्या वापरात काटकसर, पर्जन्य जलपुन:भर्रण आणि जास्तीत जास्त पर्यावरणपूरक बांधकाम साहित्य व साधन-सामुग्रीचा वापर करणे आवश्यक राहील.

४) प्रत्यक्ष बांधकाम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

५) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे नियोजन करुन, इमारत बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.) जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

६) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध) यांनी दक्षता घ्यावी.

७) या कामी प्रशासकीय मान्यतेपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती/ जिल्हा परिषदेने सोसावा.

८) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीमध्ये अपंगांना सोयी-सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा निर्माण करणे बंधनकारक राहील.

९) नियोजीत पातूर पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाकरीता प्रस्तावित करण्यात आलेल्या आराखड्यात पदाधिकारी यांच्या दालनालगत महिला पदाधिकारीसाठी प्रसाधनगृहासह विश्रांती कक्षाची व्यवस्था करण्यात यावी.

५. पंचायत समिती पातूर (जि.अकोला) नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे:-

| GENERAL ABSTRACT FOR CONS. OF PATUR P.S.ADMIN.BLDG | | |
|---|---|---|
| Sr.No. | Description of Item | Cost in Rs |
| 1 | Cost of Estimate Main Building | 18978249.00 |
| 2 | Cost of Estimate Compound wall | 2155438.00 |
| 3 | Cost of Estimate Road Work | 2305145.00 |
| 4 | Cost of Four Wheeler stand | 638611.00 |
| 5 | Cost of Two Wheeler stand | 323641.00 |
| 6 | Cost of slab drain | 670443.00 |
| 8 | Cost of Ground Development | 278460.00 |
| 9 | Cost of dismantling existing Building | 134099.00 |
| | **Total** | **25484086.00** |
| 10 | Add for 1.5% Laboratory testing charges as per corrigendum 1 Dt 3.11.2014 | 382261.00 |
| 11 | Add for 1% for Work Insurance | 254841.00 |
| 12 | Add for 4% for Contingencies | 1019363.00 |
| 13 | Add for 2% Computerization | 509682.00 |
| 14 | Add for Electrician (Internal & External) 11% on Cost of Estimate Main Building | 2087607.00 |
| 15 | Add for Water Supply 8% on Cost of Estimate Main Building | 1518260.00 |
| 16 | Add for MSEDCL Connection | 10000.00 |
| 17 | Add for fighting conductor, Fire Fighting Equipment and for disposal of Bio Medical waste (LS) | 300000.00 |
| | **TOTAL Rs.** | **31566101.00** |
| | **SAY Rs.** | **31566000.00** |

६. उपरोक्त प्रशासकीय इमारत बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात टप्प्या-टप्प्याने निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल. यावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

७. या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्याकडुन त्वरेने तांत्रिक मान्यता घेण्यात येवून त्याची प्रत शासनास सादर करावी.

८. प्रस्तुत कामाची माहिती कंस्ट्रक्शन ट्रॅकर प्रणालीवर अद्ययावत करावी.

९. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यांत आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे.

१०. सद्गर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक **२०१९०१२९११४७०९४५२०** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dilip Babasaheb Patil

Digitally signed by Dilip Babasaheb Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development And Water Conservation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e461e0a32ec649f0a60e4372f7cbbb3edff433d33cc0d95db6f8dbf1fa4f7f, cn=Dilip Babasaheb Patil
Date: 2019.01.29 13:06:40 +05'30'

( दि.बा.पाटील )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद
२) विभागीय आयुक्त अमरावती विभाग अमरावती
३) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर
४) मुख्य अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो.,कॅम्प ऑफिस, मध्यवर्ती इमारत, पुणे
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद अकोला
६) अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद अकोला
७) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद अकोला
८) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद अकोला
९) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा अकोला
१०) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा अकोला
११) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा कोकण विभाग, नवी मुंबई
१२) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, अकोला
१३) सभापती, पंचायत समिती, पातूर, जिल्हा अकोला
१४) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, पातूर, जिल्हा अकोला
१५) निवड नस्ती,कार्यासन क्र.बांधकाम-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई